क्र. स्वग्रायो २००९/ प्र.क्रं १५२/ यो-३
ग्रामविकास व जलसंधारण विभाग
मंत्रालय, मुंबई -३२
दिनांक : २२ जुलै, २००९

प्रती,
उपायुक्त (विकास)
विभागीय आयुक्त यांचे कार्यालय,
कोकण .मुंबई/ नाशिक/पुणे/औरंगाबाद/ अमरावती/ नागपूर

विषयः- दिनांक १७ जुलै, २००९ रोजी सर्व उप आयुक्त (विकास) यांची स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजना व इंदिरा आवास योजना यांचा सन २००८-०९ व सन २००९-१०(जून, २००९ पर्यंत) आढाव्याबाबत झालेल्या बैठकीचे कार्यवृत्त.

महोदय,

सोबत दिनांक १७ जुलै, २००९ रोजी सर्व उप आयुक्त (विकास) यांची स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजना व इंदिरा आवास योजना यांचा सन २००८-०९ व सन २००९-१०(जून, २००९ पर्यंत) आढाव्याबाबत झालेल्या बैठकीचे कार्यवृत्त पाठविले आहे.

२. आपल्या कार्यक्षेत्रातील सर्व प्रकल्प संचालक यांना सदर कार्यवृत्त वितरीत करण्यात यावे व कार्यवृत्तानुसार विहीत मुदतीत कार्यवाही करण्यात यावी.

३. सदर कार्यवृत्त महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाइटवर उपलब्ध करण्यात आला असून , त्याचा संगणक सांकेताक क्र. **२००९०७२२१७०२२८००१** असा आहे.

आपला विश्वासू,

(रा. श. नागरे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

C:\lotus\work\wordpro\Karyavrutta Note July 09 Adhava baithak.lwp

## ग्राम विकास व जलसंधारण विभाग/योजना

| अ. क्र. | विषय | बैठकीत चर्चिलेले मुद्दे | बैठकीत झालेले निर्णय | अंमलबजावणी करणारे अधिकारी | अंमलबजावणी चा विहित कालावधी |
|---|---|---|---|---|---|
| | | **स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजना** | | | |
| १ | सन २००८-०९ या कालावधीतील खर्चाचा आढावा | सन २००८-०९ मध्ये राज्याचा एकूण उपलब्ध निधीतून ९६.६७% व एकूण नियतव्ययातून १०१ % खर्च झाला आहे. | ९६ % वरील खर्च केलेल्या जिल्हयांचे अभिनंदन मात्र त्याखालील खर्च केलेल्या जिल्हयांनी अधिक लक्ष देवून सन २००९-१० या वर्षात प्रभावीपणे अंमलबजावणी करुन शक्यतो सुरुवातीची शिल्लक (O.B.) शिल्लक राहणार नाही याबाबत दक्षता घ्यावी. | प्रकल्प अधिकारी, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा. | सन २००९-१० |
| २ | प्रशिक्षणावरील खर्च | सन २००८-०९ मध्ये प्रशिक्षणावर केवळ ७२% खर्च झाला आहे. वस्तुतः नाविन्यपूर्ण प्रकल्प निश्चित करुन त्याबाबत स्वरोजगारींना प्रशिक्षण देणे अपेक्षित आहे. सद्यःस्थितीत जास्तीत जास्त प्रकल्प दुभती जनावरे व दुग्धजन्य प्रकल्प याच्याशीच संबंधित असलेले दिसून येतात.<br>खडु व इतर शैक्षणिक साहित्य तयार करण्यासाठी बचत गटांना प्रशिक्षण दिल्यास व सदर साहित्य बचत गटांकडूनच घेणे बंधनकारक केल्यास त्याचा फायदा दारिद्रय रेषेखालील कुटूंबाना होवू शकेल, अशी सूचना उपायुक्त औरंगाबाद यांनी केली. | १) उप आयुक्त (विकास) यांनी याबाबत प्रकल्प संचालकांच्या बैठकीत प्रकल्प संचालक यांचेशी चर्चा करुन त्यांना मार्गदर्शन करावे.<br>२) जिल्हया स्वरोजगारींना देणात येत असलेल्या प्रशिक्षण वर्गांना अचानक भेट देवून प्रशिक्षणाचा दर्जा तपासावा. तसेच प्रशिक्षण विहित कालावधीत होते अथवा नाही, याबाबतही खात्री करावी. पुढील बैठकीत उप आयुक्त (विकास) आपले अनुभव सांगावेत<br>३) या शैक्षणिक साहित्याबाबत त्याचा दर्जा विषयक मानके व किंमत याबाबतची प्रमाणके निश्चित करुन खरेदी बंधनकारक करण्याचा प्रस्ताव उप आयुक्त (विकास) औरंगाबाद विभाग हे सादर करतील. | उप आयुक्त (विकास) सर्व.<br>अनु क्र.३ बाबत उप आयुक्त (विकास) औरंगाबाद विभाग | सन २००९-१०<br>अनु.क्र.३ बाबत १५ दिवस |
| ३ | पतपुरवठा वितरण, | सन २००८-०९ मध्ये एकूण पतपुरवठा वितरण ३०७९५.३५ लाख इतके उद्दीष्ट होते. त्यापैकी रु.२६३३४.११ लाख इतके पतपुरवठा वितरण झाले. साध्य ८६% इतके आहे. | केंद्र शासनाच्या निदेशाप्रमाणे व योजनेची प्रभावी अंमलबजावणी होण्याच्या दृष्टीने सदर साध्य अपेक्षे इतके नाही. त्याचप्रमाणे अनुदान व कर्ज यांचे प्रमाण १:३ इतके असावयास हवे ते १:१.९६ इतके येते. उप आयुक्त (विकास) यांनी याबाबत अधिक लक्ष घालून प्रकल्प संचालकांच्या बैठकीत याचा वेळोवेळी आढावा घेवून उद्दीष्ट १००% पूर्ण होईल व प्रमाणात ही वाढ होईल याबाबत दक्षता घ्यावी. | उप आयुक्त (विकास) सर्व.<br>प्रकल्प अधिकारी, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा. (सर्व) | सन २००९-१० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ४ | अल्पसंख्याक लाभार्थ्यांना सहाय्य. वैयक्तिक स्वरोजगारांना सहाय्य. अपंग स्वरोजगारांना सहाय्य. | सन २००८-०९ मध्ये याबाबत दिलेल्या उद्दीष्टाची पूर्ती समाधानकारक दिसून येत नाही. अल्पसंख्याक लाभार्थ्यांना सहाय्य उद्दीष्ट केवळ ८३%, अपंग लाभार्थ्यांना सहाय्य उद्दीष्ट केवळ ६३ % व वैयक्तिक स्वरोजगारांना सहाय्य उद्दीष्ट केवळ ६७% इतके झाले आहे. या उद्दीष्टांबाबत केंद्र शासन अतिशय आग्रही असून त्याचा अंतर्भाव मा.पंतप्रधानांच्या १५ कलमी कार्यक्रमात करण्यात आला आहे. अपंगाच्या उद्दीष्टांबाबत सन १९९५ च्या अपंगासाठी असलेल्या अधिनियमानुसार त्याची पूर्तता होणे आवश्यक आहे. यासाठी सन २००९-१० मध्ये सदर उद्दीष्ट १००% पूर्ण होईल या दृष्टीने उपाययोजना करावी. | १) अंदाज माहे ऑगस्ट, २००९ मध्ये विधानसभा निवडणूकांसाठीची आचारसंहिता लागु होण्याची शक्यता आहे. त्यासाठी आताच सुमारे १ महिन्याच्या कालावधीत संबंधित स्वरोजगारी निश्चित करुन त्यांना लाभ देण्याच्या दृष्टीने कार्यवाहीचे नियोजन करुन त्याप्रमाणे अंमलबजावणी करण्यात यावी.<br>२) उप आयुक्त (विकास) यांनी प्रकल्प संचालकांच्या बैठकीत वेळोवेळी आढावा घेवून उद्दीष्ट पूर्ण करण्यासाठी उदयुक्त करावे.<br>३) अल्पसंख्याक स्वरोजगारीचे उद्दीष्ट एखाद्या जिल्हयात उपलब्ध असलेल्या अल्पसंख्याक कुटूंबाच्या प्रमाणात जास्त वाटत असल्यास, संबंधित जिल्हयातील प्रकल्प संचालक यांचेकडून त्याबाबत प्रमाणपत्र घेवून, विभागीय आयुक्त यांच्या मान्यतेने सदर उद्दीष्ट कमी करुन उर्वरीत संख्या विभागातील अन्य जिल्हयात विभागून देण्यात यावी. | उप आयुक्त (विकास) सर्व. प्रकल्प अधिकारी, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा. (सर्व) | सन २००९-१० |
| ५ | सन २००९-१० या कालावधीतील खर्चाचा आढावा | सन २००९-१० मध्ये केंद्र शासनाने राज्यासाठी एकूण रु.२१६६८.०० लाख इतके आर्थिक उद्दीष्ट कळविले आहे. त्यामध्ये रु.१६२५१.०० लाख इतका केंद्र शासनाचा हिस्सा व रुपये ५४१७.०० लाख इतका राज्यशासनाचा हिस्सा आहे.<br>तिमाहिनुसार वाटप केलेल्या उद्दीष्टांच्या विगतवारीप्रमाणे जून २००९ पर्यन्त या एकूण नियतव्ययाच्या १५% खर्च होणे अपेक्षित आहे. तथापि काही जिल्हे वगळता मोठया प्रमाणावरील जिल्हयांकडून अपेक्षेइतका १५% खर्च झालेला नाही. | मागील वर्षाचा अनुभव लक्षात घेता उप आयुक्त (विकास) यांनी लक्ष देवून प्रकल्प संचालक यांची वेळोवेळी बैठका घेवून त्यांना खालीलप्रमाणे सुचना द्याव्यात.<br>१) योजनेची प्रभावी अंमलबजावणी करुन निधी पूर्णपणे खर्च होईल व सुरुवातीची शिल्लक (O.B.) शिल्लक राहणार नाही याबाबत दक्षता ध्यावी.<br>२) पतपुरवठा वितरण उद्दीष्ट १००% साध्य व्हावे,<br>३) अनुदान व कर्ज यांचे प्रमाण १:३ इतके अपेक्षित आहे. सद्यस्थितीत ते १:१.९६ इतके येते. त्यामध्ये अपेक्षित इतका वाढ होईल यासाठी नाविन्यपूर्ण प्रकल्प जास्तीत जास्त प्रमाणात निश्चित करावेत. | | |
| ६ | पतपुरवठा वितरण, | सन २००९-१० साठी केंद्र शासनाने पतपुरवठयाचे एकूण उद्दीष्ट रु. ३५८१९.८५ लाख इतके दिले आहे.<br>तिमाहिनुसार वाटप केलेल्या उद्दीष्टांच्या विगतवारीप्रमाणे जून २००९ पर्यन्त या एकूण उद्दीष्टाच्या १५% पतपुरवठा वितरण होणे अपेक्षित | ४) अल्पसंख्याक स्वरोजगारीचे उद्दीष्ट एखाद्या जिल्हयात उपलब्ध असलेल्या अल्पसंख्याक कुटूंबाच्या प्रमाणात जास्त वाटत असल्यास, संबंधित जिल्हयातील प्रकल्प संचालक यांचेकडून त्याबाबत प्रमाणपत्र घेवून, विभागीय आयुक्त यांच्या मान्यतेने सदर उद्दीष्ट कमी करुन उर्वरीत संख्या | | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | आहे. तथापि बहुतांश जिल्हयांकडून अपेक्षेइतके १५% पतपुरठा वितरण झालेले नाही. | विभागातील अन्य जिल्हयात विभागून देण्यात यावी.<br>अंदाजे माहे ऑगस्ट, २००९ मध्ये विधानसभा | | |
| ७ | अल्पसंख्याक लाभार्थ्यांना सहाय्य.<br>वैयक्तिक स्वरोजगारींना सहाय्य.<br>अपंग स्वरोजगारींना सहाय्य. | केंद्र शासनाने विहित केलेली बचत गटांबाबतच उद्दीष्टे शासन परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक स्वग्रायो २००९/प्र.क्र.१२२/योजना-३, दि. ११ जून, २००९ अन्वये कळविली आहेत सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inयेथे संगणक सांकेतांक क्र.२००९०६६१११२०७३०००१ वर उपलब्ध आहे.<br>या उद्दीष्टांबाबत आढावा घेतला असता जिल्हयांनी अपेक्षे इतके प्रमाण राखलेले नसल्याचे दिसून आले आहे. सदर उद्दीष्ट कमी प्रमाणात साद्य झाले तर केंद्र शासनाकडील राज्यांच्या एकूण गुणानुक्रमाने राज्याचा क्रमांक बराच खाली येतो. परिणामी केंद्र शासनाकडून नाराजी कळविली जाते. | निवडणुकीबाबतची आचार संहिता लागु होण्याची शक्यता असल्याने व आचार संहितेच्या कालावधीत लाभ देण्याची कार्यवाही करता येणार नसल्याने संपूर्ण उद्दीष्ट पूर्तीच्या दृष्टीने त्या आगोदर योजनेवरील खर्चाच्या बाबी, नाविन्यपूर्ण प्रकल्प, केंद्र शासनाने दिलेल्या व मार्गदर्शक तत्वानुसार विहित केलेल्या स्वरोजगारींच्या उद्दीष्टानुसार स्वरोजगारी निश्चित करणे, या स्वरोजगारींचे प्रशिक्षण इत्यादी बाबींचे नियोजन करुन अंमलबजावणी करण्यात यावी. या कार्यवाहीत उप आयुक्त विकास यांनी स्वतः लक्ष घालावे.<br>५) राज्यशासनाकडील राज्य समरुप हिश्याची निधी वितरणाची कार्यवाही स्वतंत्ररित्या करण्यात येत आहे. जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांनी जिल्हाधिकारी यांचेकडून मिळावयाचा सर्वसाधारण क्षेत्रातील निधी येत्या ८ दिवसात उपलब्ध करुन घ्यावा. | | |
| ८ | व्याजावरील अनुदान | सन २००८-०९ या वर्षात दिनांक ३० मार्च, २००९ रोजी रु.१०.०० कोटी दारिद्रय रेषेखालील स्वयंसहायता गटांना, त्यांनी सन २००८-०९ या वर्षात निर्यमितपणे कर्जफेड पूर्ण केली असल्यास, ७ % पर्यन्त व्याजावरील अनुदान देण्यासाठी रक्कम वितरीत केली आहे. मात्र अद्यापही कोणत्याही गटाला रक्कम दिली नसल्याचे मात्र एखादे प्रकरण वगळता कोणत्याही गटाला अद्यापि अनुदानाची रक्कम वितरीत केल्याचे दिसत नाही. याबाबत मा.मंत्री (ग्राम विकास) यांनी वेळोवेळी विचारणा केली आहे. तसेच अधिवेशनातही विधान परिषदेत याबाबत मा.सदस्यांनी मुद्दे उपस्थित केले होते.<br>अमरावती विभागातील अमरावती व बुलढाणा या जिल्हयांना वाटप करण्यात आलेले अनुक्रमे | १) उप आयुक्त (विकास) यांनी प्रकल्प संचालकांच्या बैठकीत याबाबत आढावा घ्यावा.<br>२) आहरण न केलेल्या प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांचेविरुध्द विभागीय आयुक्त स्तरावर कारवाई करण्यात यावी.<br>३) सन २००८-०९ या आर्थिक वर्षात नियमितपणे कर्जफेड पूर्ण केलेले स्वयंसहायता गट निश्चित करुन त्यांना दयावयाची रक्कम, प्रकरण तपासून त्वरीत अदा करण्यात यावी. यासाठी प्रकल्प संचालक यांनी बँकेशी स्वतः संपर्क करुन त्वरीत कार्यवाही होईल असे पहावे.<br>४. शासन परिपत्रक ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. स्वग्रायो-२००९/प्र.क्र.१३१/योजना-३, दिनांक २३ जून, २००९ अन्वये व्याजावरील अनुदान वितरणाबाबतची माहिती पाठविण्यासाठी नमुना विहित केला आहे. सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या | उप आयुक्त (विकास) सर्व.<br>प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, सर्व. | १ महिना, अनु.क्र.५ बाबत १५ दिवस, |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | रक्कम रु. ४९.५३ लाख व २१.२० लाख विहित वेळेत आहरण न केल्याने व्यपगत झाले.<br>उपरोक्त बाबी गंभीर आहेत. | www.maharashtra.gov.inयेथे संगणक सांकेतांक क्र.२००९०६२३१२२०६०६००१ वर उपलब्ध आहे.<br>सदर नमुन्यात दर महिन्यास स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजनेचा मासिक अहवाल पाठवितांना याबाबतची माहिती सोबत पाठविण्यात यावी. (परिपत्रकाच्या प्रती सर्व उप आयुक्त यांना बैठकीत दिल्या आहेत.)<br>५) या वितरणाबाबत महालेखापाल यांच्याकडे बैठक झाली असता या शिर्षाखाली एकूण रु. १ कोटी २१लाख ३हजार इतकी बचत झाल्याचे दिसून आले आहे. त्याबाबत तपासणी करुन रक्कम अन्य शिर्षाखाली काढली असल्यास महालेखापाल यांच्याकडे ताळमेळ घेवून आवश्यक असल्यास दुरुस्ती अहवाल (Note of Error) पाठविण्यात यावा. ही सर्व कार्यवाही तातडीने करुन उपआयुक्त (विकास) यांनी जिल्हा निहाय एकत्रित अहवाल शासनास सादर करावा. | |
| ९ | R-SETI स्थापन करणे | राज्यातील रत्नागिरी, पुणे, सोलापूर, नाशिक, औरंगाबाद, अमरावती व नागपूर या जिल्हयांसाठी केंद्र शासनाने रु.१ कोटीचा निधी NIRD हैद्राबाद यांचेकडे सूपूर्द केला आहे. या जिल्हयांचे विहित नमुन्यातील प्रस्ताव NIRD हैद्राबाद यांचेकडे पाठविले आहेत. तसेच जागा हस्तांतरणाची कार्यवाही चालु आहे.<br>मात्र नाशिक, औरंगाबाद व अमरावती हे ३ जिल्हे वगळता उर्वरीत जिल्हयात अद्यापि भाडयाच्या जागेत R-SETI सुरु झालेली नाही.<br>सांगली, कोल्हापूर, नांदेड, परभणी, वर्धा, यवतमाळ, बुलढाणा, अकोला, अहमदनगर, ठाणे व सिंधुदूर्ग या जिल्हयांनी विहित नमुन्यातील प्रस्ताव NIRD हैद्राबाद यांचेकडे पाठविले आहेत<br>उर्वरित जिल्हयांनी अद्यापि प्रस्ताव पाठविलेले नाहीत. | १) निधी मंजूर झालेल्या जिल्हयांनी भाडयाच्या जागेत R-SETI स्थापन करणेबाबत तातडीने कार्यवाही करावी.<br>२) जागा उपलब्ध करुन देण्याची सुरु असलेली कार्यवाही उप आयुक्त (विकास) यांनी आयुक्त स्तरावरुन तातडीने पूर्ण करुन घ्यावी.<br>३) R-SETI स्थापन करणेसाठी विहित केलेला नमुना (अ.शा.पत्र क्र.स्वग्रायो-२००९/प्र.क्र.११/योजना-३, दिनांक १६ फेब्रुवारी, २००९ च्या सोबत) बैठकीत सर्व उप आयुक्त यांना वितरीत करण्यात आला आहे. या नमुन्यात, प्रस्ताव न पाठविलेल्या जिल्हयांनी आपले प्रस्ताव NIRD हैद्राबाद यांचेकडे १५ दिवसात पाठवावेत व जागेच्या हस्तांतरणाची कार्यवाही पूर्ण करुन घ्यावी. | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १० | वेबसाईटवर स्वयंसहायता गटांची सुची (SHG DIRECTORY) अपलोड करणे. | याबाबत केंद्र शासनाकडून विहित करण्यात आलेल्या सुचना शासन परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.स्वग्रायो-२००६/प्र.क्र.५९९/ योजना-३ दिनांक २ जानेवारी, २००७ अन्वये सर्व प्रकल्प संचालक यांना वितरीत करण्यात आल्या होत्या. त्यानंतर अ.शा.पत्र समक्रमांक दिनांक १६ मार्च, २००९ अन्वये यासाठीचा विहित नमुना व उपरोक्त परिपत्रक पाठविण्यात आले होते. तथापि याबाबत सर्व जिल्हयांनी अद्यापि कार्यवाही केलेली दिसून येत नाही. या अ.शा.पत्रान्वये, सुची वेबसाईटवर अपलोड करुन त्याबाबतचे प्रमाणपत्र/पुर्तता अहवाल केंद्र शासनास पाठवावा असे कळवूनही जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, औरंगाबाद यांनी सुची अपलोड न करता टंकलिखित सुची शासनास पाठविण्यात आली, ती परत करण्यात आली. | १) सुची केवळ लिखित स्वरुपात न करता, ती जिल्हयाच्या वेबसाईटवर अपलोड करावी.<br>२) सुची वेबसाईटवर अपलोड केल्याबाबत केंद्र शासनास व राज्यशासनास प्रमाणपत्र/पूर्तता अहवाल (सुची नव्हे) सादर करावा.<br>३) ही सर्व कार्यवाही पूर्ण करण्याबाबत उप आयुक्त (विकास) यांनी स्वत: लक्ष घालावे. सदर प्रकरण बराच काळ प्रलंबित असून केंद्र शासनाकडून वारंवार तगादे येत असल्याने या प्रकरणी विहित वेळेत कार्यवाही न करणा-या प्रकल्प संचालक यांचेविरुध्द कारवाई प्रस्तावित करावी. | प्रकल्प संचालक जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, सर्व.<br>उप आयुक्त (विकास) सर्व. | १ महिना. |
| ११ | स्वयंसहायता गटांनी उत्पादीत केलेल्या उत्पादनाची माहिती केंद्र शासनाच्या वेबसाईटवर अपलोड करण्याबाबत. (Inventory of Products Made by SHG ) | स्वयंसहायता गटांनी उत्पादीत केलेल्या मालाची माहिती देण्यासाठी केंद्र शासनाने विकसीत केलेल्या www.rural.nic.in या वेबसाईटवर सदर उत्पादने व फोटो अपलोड करण्याबाबत शासन पत्र क्र.पणन २००७/प्र.क्र.३५२/योजना-१, दि.५ ऑक्टोबर, २००७ च्या पत्रान्वये सर्व जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना सुचना दिल्या आहेत. त्यानंतर दिनांक २१ फेब्रुवारी,२००८ व दिनांक १० जून, २००९ च्या पत्रान्वये पाठपुरावा करण्यात आला आहे. तथापि याबाबत अद्यापि पूर्णपणे कार्यवाही झालेली दिसून येत नाही. याबाबत केंद्र शासनाने वेळोवेळी राज्य शासनाकडे तगादा केला आहे. त्यामुळे सदर माहिती तातडीने अपलोड होणे आवश्यक आहे. | १) उप आयुक्त (विकास) यांनी प्रकल्प संचालकांच्या बैठकीत याबाबत आढावा घ्यावा.<br>२) याबाबतची सुची केवळ लिखित स्वरुपात न करता, ती वेबसाईटवर उत्पादनाच्या फोटोसह अपलोड करावी.<br>३) सुची वेबसाईटवर अपलोड केल्याबाबत केंद्र शासनास व राज्यशासनास प्रमाणपत्र/पूर्तता अहवाल (सुची नव्हे) सादर करावा.<br>३) ही सर्व कार्यवाही पूर्ण करण्याबाबत उप आयुक्त (विकास) यांनी स्वत: लक्ष घालावे. सदर प्रकरण बराच काळ प्रलंबित असून केंद्र शासनाकडून वारंवार तगादे येत असल्याने या प्रकरणी विहित वेळेत कार्यवाही न करणा-या प्रकल्प संचालक यांचेविरुध्द कारवाई प्रस्तावित करावी. | प्रकल्प संचालक जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, सर्व.<br>उप आयुक्त (विकास) सर्व. | १ महिना. |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १२ | राज्यशासनामार्फत जिल्हा व तालुका स्तरावर बांधण्यात येणारे विक्री केंद्रे | स्वयंसहायता गटांच्या बळकटीकरणासाठी राज्य शासनाने निर्योजित केलेल्या कार्यक्रमात जिल्हा व तालुका स्तरावरील कायम स्वरुपी विक्री केंद्र बांधण्याचा अंतर्भाव आहे. याबाबत शासन निर्णय दिनांक २७ फेब्रुवारी, २००९ निर्गमित करण्यात आला आहे.सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inयेथे संगणक सांकेतांक क्र.२००९०२२७१८००१८००१ वर उपलब्ध आहे.<br>आतापर्यन्त एकूण ९ जिल्हे व या जिल्हयातील एकूण ६५ तालुके येथे विक्री केंद्र बांधकमाचे प्रस्ताव प्राप्त झाले आहेत. नजिकच्या काळात निधी वितरण करावयाचा असल्याने उर्वरीत जिल्हे व तालुक्यांकडून प्रस्ताव प्राप्त होणे आवश्यक आहे. | १) जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांकडील उर्वरीत प्रस्ताव येत्या ७ दिवसात शासनास सादर करावा.<br>२) याबाबत उप आयुक्त (विकास) यांनी स्वत: पाठपुरावा करुन सदर प्रस्ताव परिपूर्ण स्थितीत (जागेचा ७/१२ उतारा, प्रॉपर्टी कार्ड व नकाशा इ.) शासनास प्राप्त होतील असे पहावे.<br>३) सुरुवातीच्या काळात ज्या जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांकडे स्वत:ची, जिल्हा परिषदेची अथवा अन्य विभागाकडून मिळालेली प्राप्त झालेली जमीन असेल अशा जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांकडून प्रस्ताव अपेक्षीत आहे, जेणेकरुन निधी वितरीत करुन बांधकाम सुरु करता येईल. | प्रकल्प संचालक जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, सर्व.<br>उप आयुक्त (विकास) सर्व. | ८ दिवस |
| १३ | विभागीय व जिल्हा स्तरावर सरस महालक्ष्मी च्या धर्तीवर विक्री प्रदर्शने आयोजित करणे, | वर स्पष्ट केल्यानुसार, राज्यशासनाच्या स्वयंसहायता गटाच्या बळकटी करणासाठीच्या कार्यक्रमामध्ये केंद्र शासनाच्या सहाय्याने महालक्ष्मी सरस प्रदर्शन राज्यस्तरावर आयोजित करण्यात येते, त्याप्रमाणे स्वयंसहायता गटाच्या उत्पादीत मालाच्या विक्री व प्रदर्शनासाठी विभागीय व जिल्हा स्तरावर दरवर्षी विक्री प्रदर्शने भरवण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यानुसार विभागीय स्तरावरील विक्री प्रदर्शनासाठी रु.२५,००,०००/- व जिल्हा स्तरावरील विक्री प्रदर्शनासाठी रु.१०,००,०००/- वितरीत करण्यात येणार आहेत. यासाठी प्रत्येक जिल्हा व विभाग स्तरावरील प्रदर्शनांचे कालदर्शीका तयार करण्यासाठी जिल्हयांनी त्यांच्या सोयीनुसार आयोजित करावयाच्या विक्री प्रदर्शनाचा विहित दिनांक शासनास कळवावयाचा आहे. | १) जिल्हयांनी त्यांचा स्थानिक उत्सव, जत्रा, सार्वजनिक सुट्टया इत्यादी लक्षात घेवून राज्यस्तरावरील, विभाग स्तरावरील व लगतच्या जिल्हयांचा प्रदर्शनाचा कालावधी वगळून विभागीय आयुक्तांच्या मान्यतेने दिनांक कळवावा. | प्रकल्प संचालक जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, सर्व.<br>उप आयुक्त (विकास) सर्व. | ८ दिवस, |

## इंदिरा आवास योजना

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ | सन २००८-०९ या वर्षातील आर्थिक व भौतिक उद्दीष्ट साध्य करण्याबाबत.<br>इंआयो-२००९/प्र.क्रं ९२/ यो-१० | सन २००८-०९ या कालावधीत केंद्र शासनाने दिलेले आर्थिक उद्दीष्ट व भौतिक उद्दीष्ट यांचे साध्य अनुक्रमे ९५.०५ % व ९८.५४ % इतके आहे. मात्र सन २००९-१० या वर्षात दिलेले उद्दीष्ट १००% पूर्ण होणे अपेक्षित आहे. सदर उद्दीष्टे शासन पत्र क्र. इंआयो-२००९/प्र.क्रं ९२/ यो-१० , दिनांक २७ एप्रिल, ०९ अन्वये सर्व जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना कळविले आहेत | १) अंदाजे माहे ऑगस्ट, २००९ मध्ये विधानसभा निवडणुकींची आचारसंहिता लागू होण्याची शक्यता आहे. त्यासाठी आताच १५ दिवसाच्या कालावधीत संबंधित लाभार्थी निश्चित करुन दिनांक ३१ जुलै, २००९ पर्यन्त सर्व घरकुलांना मंजूरी देण्यात यावी. जेणेकरुन घरकुल मंजुरीसाठी आचारसंहीतेचे बंधन येणार नाही.<br>२) मागील वर्षी सन २००८-०९ मध्ये पत्र क्र. फेब्रुवारी-मार्च २००९ मध्ये घरकुलांचे अन्वये वाढीव उद्दीष्टे देण्यात आले होते. त्याचा अंतर्भाव सन २००९-१० मध्ये दिलेल्या भौतीक उद्दीष्टात करण्यात आलेला आहे. त्यामुळे ती उद्दीष्टे स्वतंत्र गणण्यात येऊ नयेत.<br>३) राज्यशासनाकडील राज्य समरुप हिश्याची निधी वितरणाची कार्यवाही स्वतंत्ररित्या करण्यात येत आहे. जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांनी जिल्हाधिकारी यांचेकडून मिळावयाचा सर्वसाधारण क्षेत्रातील निधी येत्या ८ दिवसात उपलब्ध करुन घ्यावा. | प्रकल्प संचालक जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, सर्व. | १० दिवस |
| २ | अल्पसंख्याकाचे सुधारीत उद्दीष्ट | ज्या जिल्हयांमध्ये अल्पसंख्याक लाभार्थ्यांची संख्या जास्त आहे, त्या जिल्हयांना १५% पेक्षा वाढीव व ज्या जिल्हयांमध्ये अल्पसंख्याक लाभार्थी कमी आहेत, त्या जिल्हयांनी १५% पेक्षा कमी उद्दीष्टे निर्धारीत करुन शासन पत्र क्र. इआयो-०९/प्र.क्र.१२/योजना-१०, दिनांक २० जून, २००९ अन्वये अल्पसंख्याकाचे सुधारीत उद्दीष्ट कळविण्यात आले आहे. | १) अल्पसंख्यांक लाभार्थ्यांच्या उद्दीष्टाबाबत केंद्र शासनाकडून वेळोवेळी पाठपुरावा होतो त्यामुळे सदर उद्दीष्ट १००% पूर्ण होणे आवश्यक आहे.<br>२) जिल्हयांना दिलेल्या एकूण भौतिक उद्दीष्टांमधुन अल्पसंख्याक घरकुल वाटप करावयाचे आहेत. अतिरिक्त घरकुले दिली जाणार नाहीत.<br>३) ३१ जुलैपर्यंत लाभार्थीची निवड न केल्यास त्याची जबाबदारी प्रकल्प संचालकांवर राहिल. | प्रकल्प संचालक जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, सर्व. | सन २००९-१० |